मुख्य अभियंता (स्थापत्य) संवर्गातील
अधिकाऱ्यांच्या बदल्या / पदस्थापना

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक बांधकाम विभाग

**शासन आदेश क्रमांकः टीएफएस-१३२०/प्र.क्र. ५८(२)/ सेवा-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: २९ ऑक्टोबर, २०२०

**संदर्भ :** सा. बां. विभाग शासन आदेश क्र. टीएफएस-१३२०/प्र.क्र. ५८(५)/सेवा-१, दि. ७.८.२०२०

**शासन आदेश :-**

संदर्भीय दि. ७.८.२०२० च्या आदेशान्वये श्री. खं. तु. पाटील यांची बदली मुख्य अभियंता, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई (औरंगाबाद शिबीर कार्यालय) या श्री. उकीर्डे यांच्या बदलीमुळे रिक्त होणाऱ्या प्रतिनियुक्तीच्या पदावर करण्यात आली होती. तथापि, श्री. पाटील हे सदर पदावर रुजू झाले नाहीत.

श्री. खं. तु. पाटील यांच्या विनंतीनुसार तसेच सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोयीच्या कारणास्तव त्यांच्या पदस्थापनेत अंशत: बदल करण्यात येत असून त्यांची सुधारित पदस्थापना मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई या श्री. सु. अ. वांढेकर यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदावर करण्यात येत आहे.

२. मुख्य अभियंता, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई (औरंगाबाद शिबीर कार्यालय) या पदावर अन्य अधिकाऱ्याच्या पदस्थापनेचे आदेश यथावकाश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

३. श्री. पाटील यांनी त्यांच्या नवीन पदाचा कार्यभार त्वरीत स्वीकारावा व आपला पदग्रहण अहवाल शासनास विनाविलंब सादर करावा. त्यांनी अनधिकृतरित्या गैरहजर राहू नये अन्यथा त्यांची अनुपस्थिती ही अनधिकृत गैरहजेरी म्हणून समजण्यात येईल व विनावेतन करण्यात येईल तसेच त्यांच्या सेवेत खंड पडण्याची शक्यता नाकारता येत नाही याची जाणीव संबंधितांना करुन देण्यात येत आहे. तसेच, श्री. पाटील यांचे लक्ष महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम २३ कडे वेधण्यात येत आहे. सदर नियमातील तरतूदी लक्षात घेता, त्यांनी पदस्थापनेत बदल करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील.

४. संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी श्री. पाटील यांनी सध्याचा कार्यभार सोडल्याचा तसेच नवीन कार्यभार स्वीकारल्याचा दिनांक त्वरित शासनास doser1.pwd@maharashtra.gov.in या ई-मेल पत्त्यावर कळवावा.

५. श्री. पाटील यांची बदली त्यांच्या विनंतीनुसार करण्यात येत असल्याने त्यांना पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहणार नाही.

६. श्री. पाटील यांनी नवीन नियुक्तीच्या पदाचा पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास तसेच संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप, पुणे यांना कळवावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१०२९१७३७१२१५१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kisanrao
Babanrao Palande

Digitally signed by Kisanrao Babanrao Palande
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=514911d765e05f227cdbfc15f18f6435e0084f59637ab95f9aefeebc40be45e7, cn=Kisanrao Babanrao Palande
Date: 2020.10.29 17:39:40 +05'30'

( किसनराव पलांडे )
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. सचिव, राष्ट्रीय महामार्ग विभाग, नवी मुंबई,
३. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई/ पुणे/ नाशिक/ औरंगाबाद/ अमरावती/ नागपूर/ विशेष प्रकल्प, मुंबई/ राष्ट्रीय महामार्ग, नवी मुंबई,
४. मुख्य अभियंता (विद्युत), मुंबई,
५. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
६. संचालक, उपवने व उद्याने, मुंबई,
७. संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप पुणे,
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा ) महाराष्ट्र राज्य-१/२, मुंबई/नागपूर,
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद
११. श्री. सु. अ. वांढेकर, मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई ,
१२. श्री. खं. तु. पाटील, मुख्य अभियंता
१३. मा. मंत्री, सा.बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१४. मा. मंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई,
१५. मा. राज्यमंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१६. मा. राज्यमंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई,
१७. अपर मुख्य सचिव (सा.बां.), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई, यांचे स्वीय सहायक,
१८. सचिव ( रस्ते / बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई, यांचे स्वीय सहायक,
१९. सर्व सहसचिव / उपसचिव / अवर सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
२०. सार्वजनिक बांधकाम विभाग / आस्था-१, आस्था-३, रोखशाखा, सेवा-६, संगणक कक्ष, मंत्रालय, मुंबई,
२१. निवडनस्ती.